**राास्तभाव/ शिधावाटप दुकानांमध्ये विक्रीसाठी ठेवण्यास विविध प्रकारच्या उत्पादनांस परवानगी देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र. साविव्य-२०१९/प्र.क्र.३१८-अ/नापु-३१**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक- १७ नोव्हेंबर, २०२१

**वाचा:-** शासन निर्णय क्र. साविव्य-२०१९/प्र.क्र.३१८/नापु-३१, दि. ९ मार्च, २०२०.

**प्रस्तावना-**

उपरोक्त संदर्भिय शासन निर्णयान्वये शासनाने रास्तभाव/ शिधावाटप दुकानांमध्ये विक्रीसाठी ठेवण्यात येणाऱ्या विविध प्रकारच्या उत्पादनांबाबतचे सर्व शासन निर्णय अधिक्रमित करुन एकत्रित आदेश निर्गमित केले आहे. सदर एकत्रित आदेशानुसार लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेतील वितरीत होणाऱ्या वस्तूंसह खुल्या बाजारातील वस्तूंची विक्री रास्तभाव दुकानातून करण्यास परवानगी देण्यात आली होती. सदर खुल्या बाजारातील आणखी काही वस्तू रास्तभाव/ शिधावाटप दुकानांमध्ये विक्रीसाठी ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय -**

या शासन निर्णयान्वये उपरोक्त संदर्भिय शासन निर्णयातील नमूद वस्तूंसह खुल्या बाजारातील साबण (आंघोळ व धुण्याचा), हॅण्डवॉश, डिटर्जंटस (धुण्याचा सोडा), शाम्पू, चहापत्ती व कॉफी रास्तभाव/ शिधावाटप दुकानांमध्ये विक्रीसाठी ठेवण्यास शासन मान्यता देत आहे. ही परवानगी अस्थायी स्वरुपात देण्यात येत असून, सार्वजनिक वितरण व्यवस्थेच्या स्वरुपात वेळोवेळी होणाऱ्या बदलाच्या अनुषंगाने त्यामध्ये वेळोवेळी बदल करण्यात येईल.

उपरोक्त वस्तूंचे दुकानापर्यंत वितरण व विक्रीपोटी मिळणारे कमिशन याबाबत रास्तभाव दुकानदारांनी संबंधित कंपनीच्या वितरकांशी परस्पर संपर्क साधावा. हा व्यवहार संबंधित कंपनी व त्यांचे घाऊक व किरकोळ वितरक आणि रास्तभाव दुकानदार यामध्ये राहील. यात शासनाचा कोणताही सहभाग अथवा हस्तक्षेप राहणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११११७१५३३५९५९०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Tatoba Maruti Kolekar
Date: 2021.11.17 15:37:42 +05'30'

**( तातोबा कोळेकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.राज्यपाल यांचे सचिव,
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

५. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव,
७. मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे खाजगी सचिव,
८. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव
९. मा.प्रधान सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. मा. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक,
११. नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
१२. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१३. अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागातील सर्व सह सचिव, उप सचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी
१४. सर्व प्रशासकीय विभाग प्रमुख, मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
१५. सर्व उपायुक्त (पुरवठा),
१६. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
१७. उप संचालक पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई
१८. उप संचालक,नागरी पुरवठा (गो/वा)परळ, मुंबई
१९. महालेखापाल (लेखा/अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचे कार्यालय, मुंबई
२१. महासंचालक, माहिती जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई
२२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
२३. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबइ (१० प्रती)
२४. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
२५. अध्यक्ष, ऑल महाराष्ट्र फेअर प्राईज शॉपकिपर्स फेडरेशन, पुणे, द्वारा - गुप्ता जनरल स्टोअर्स, अन्सारी काटयासमोर, काळभोर नगर, चिंचवड, पुणे ४११ ०१९
२६. अध्यक्ष, अखिल महाराष्ट्र राज्य स्वस्त धान्य दुकानदार, केरोसीन परवाना धारक महासंघ, साई भगित्रा निवास, एन-४ सिडको, ए.सी.प्लॉट नं.९, औरंगाबाद.
२७. अध्यक्ष, मुंबई रेशन दुकानदार संघटना, ओरिएन्टल हाऊस, ७ जे टाटा मार्ग, मुंबई
२८. निवड नस्ती. (कार्यासन -नापु-३१)